**जिल्हा महिला व बाल रुग्णालय,**
**यवतमाळ येथे वस्त्रधुलाई, आहार सेवा,**
**सुरक्षा सेवा व स्वच्छता सेवा सुरु**
**करण्याकरिता प्रशासकीय मान्यता**
**देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२४/प्र.क्र.१४२ /आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ५ जून, २०२४.

वाचा :

१) **सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालय,राज्यस्तर मुंबई यांचे पत्र क्रमांक- आसेआ/कक्ष-३/टे-९/कंत्राटीसेवाप्रशामान्यता/९७०२-०४/२४ दि. २६.०४.२०२४**

## प्रस्तावना:

जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ येथे वस्त्रधुलाई, आहार सेवा, सुरक्षा सेवा व स्वच्छता सेवा सुरु करण्याकरिता आयुक्त आरोग्य सेवा, मुंबई यांच्यास्तरावर ई-निविदा प्रक्रिया राबवून न्युनतम दर असलेल्या पुरवठादारास दिनांक २०.१०.२०२२ रोजी झालेल्या केंद्रीय समितीच्या मान्यतेनुसार तीन वर्षाच्या कालावधीसाठी पुरवठा आदेश दिलेले आहेत. त्यानुसार प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय:

जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ येथे वस्त्रधुलाई, आहार सेवा, सुरक्षा सेवा व स्वच्छता सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी खालील प्रमाणे तीन वर्षाच्या कालावधीसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:

| अ.क्र. | सेवेचा प्रकार | पुरवठाधारकाचे नाव | अंदाजित तीन वर्षाकरिता येणारा खर्च | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | आहार सेवा | मे. श्री. छत्रपती शिवाजी महाराज स्वयंरोजगार | रु.१,७९,३८,०००/- (GST सह) | प्रत्यक्ष दाखल आंतरुग्ण संख्येवर आहार |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | सहकारी संस्था, नाशिक | | सेवा, वस्त्रधुलाई सेवा आवलंबून असल्याने रक्कम १०० खाटांच्या रुग्णालयाप्रमाणे अंदाजित दर्शविण्यात आलेली आहे. |
| २. | स्वच्छता सेवा | मे. महाराष्ट्र विकास ग्रुप कंपनी, नाशिक | रु.१,२६,६०,०००/- (GST वगळून) | |
| ३. | वस्त्रधुलाई सेवा | मे.रयत स्वयंरोजगार संस्था, नाशिक | रु.२१,६०,०००/- (GST वगळून) | |
| ४. | सुरक्षा सेवा | शासन निर्णायानुसार मे. मेस्को, पुणे | रु.१,०६,६२,०००/- (GST सह) | |
| **एकूण** | | | **रु.४,३४,२०,०००/-** | |

२. यवतमाळ येथील १०० खाटांचे जिल्हा महिला व बाल रुग्णालयाकरिता उपरोक्त प्रस्तावाबाबतची सविस्तर माहिती पुढील प्रमाणे.

| सेवेचा प्रकार | मासिक खर्च | अंदाजित वार्षिक/त्रिवार्षिक खर्च | |
|---|---|---|---|
| सुरक्षा सेवा | विनाशस्त्रधारी रु.२५,०००x०९ =रु.२,२५,००० (जी.एस.टी. व सर्विस चार्ज वगळून) एकूण=रु. २,२५,०००/- | रु.२,२५,०००x१२= रु.२७,००,०००/- ३ वर्षाकरिता रु.१०६,६२,०००/- (जी.एस.टी. व सर्विस चार्ज सह) | |
| स्वच्छता सेवा | वार्षिक ठेका पध्दतीने प्रति माह खर्च रु.३,५१,४६६/- (GST वगळून) | १ वर्षाकरिता रु.३,५१,४६६x१२= रु.४२,१७,५९२/- ३ वर्षाकरिता अंदाजित खर्च | |

<table>
<tr><td></td><td>बांधकाम क्षेत्राकरिता ३० रुपये प्रति चौरस मीटर व खुल्या जागेकरिता ३.५ चौ.मी.</td><td>रु.१,२६,६०,०००/-</td><td colspan="4"></td></tr>
<tr><td rowspan="8">आहार सेवा</td><td rowspan="8">सदर रुग्णालय हे १०० खाटांचे असून सरासरी १०० आंतररुग्ण रुग्णालयात दाखल होतील. प्रति रुग्ण प्रति दिवस खर्च रु.१४७+५टक्के जीएसटी त्यानुसार दिवसाचा खर्च रु.१५४x१००=रु.१,५४,०००/- मासकि खर्च रु.१,५४,०००x३०= ४६,२०,०००/-</td><td rowspan="8">अंदाजित रु.४६,२०,०००x१२ = रु.५,५४,४०,०००/- दरवर्षी मुळ दरामध्ये ५ टक्के वाढ अनुज्ञेय आहे. त्याप्रमाणे ३ वर्षाचा अंदाजित खर्च रक्कम रु.१,७९,३८,०००/-</td><td colspan="4">स्त्री प्रमाणे (मिली/ग्रॅम)</td></tr>
<tr><td>वेळ</td><td>सर्वसाधारण स्त्री</td><td>गर्भवती स्त्री</td><td>स्तनदा स्त्री</td></tr>
<tr><td>सकाळी ६ वा. चहा १५० मिली.</td><td>दूध २५ मिली, साखर ५ ग्रॅम, चहा पती २.५ ग्रॅम</td><td></td><td></td></tr>
<tr><td>सकाळी ९ वा. नाश्ता</td><td>ब्रेड/रवा/पोहे/सुजी १०० ग्रॅम</td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td>उसळ २० ग्रॅम, कंद भाजी ५० ग्रॅम, तेल ५ ग्रॅम</td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td>दूध ३०० मिली, साखर १०० ग्रॅम</td><td>दूध २०० मिली</td><td>दूध २०० मिली</td></tr>
<tr><td></td><td>फळ १ नग १०० ग्रॅम</td><td>फळ २ नग २०० ग्रॅम</td><td>फळ २ नग २०० ग्रॅम</td></tr>
<tr><td></td><td>अंडी/उसळ</td><td>१ अंडी, उसळ</td><td></td></tr>
</table>

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | २० ग्रॅम | |
| | | | दुपारी १२ वा. जेवण | २ पोळी ७५ ग्रॅम | | १पोळी २५ ग्रॅम |
| | | | | भात तांदूळ ५० ग्रॅम | | |
| | | | | वरण दाळ २० ग्रॅम, तेल २.५ ग्रॅम | | |
| | | | | फळ भाजी २०० ग्रॅम, कंद भाजी ५० ग्रॅम, तेल ५ ग्रॅम | | |
| | | | | सलाड कंद भाजी २५ ग्रॅम | | |
| | | | दुपारी ३ वा. चहा १५० मिली. | दूध २५ मिली, साखर ५ मिली, चहा पती २.५ ग्रॅम | फळ १ नग | फळ १ नग |
| | | | | | अंडी १ नग/२० ग्रॅम उसळ, १० ग्रॅम तेल | अंडी १ नग/२० ग्रॅम उसळ, १० ग्रॅम तेल |
| | | | रात्री ७ वाजता | २ पोळी ७५ ग्रॅम | | १ पोळी २५ ग्रॅम |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | तांदूळ ५० ग्रॅम | | |
| | | | | दाळ ३५ ग्रॅम, पालेभाजी १०० ग्रॅम, तेल ७.५ ग्रॅम | | |
| | | | | सलाड कंदभाजी ७५ ग्रॅम | | |
| | | | रात्री ९ वा. | दूध ३०० मिली. | दूध २०० मिली. | दूध २०० मिली. |
| वस्त्रधुलाई | मासिक सरासरी खर्च रु. ६०,०००/- (जीएसटी वगळून) | सदर रुग्णालय १०० खाटांचे असून सरासरी १०० आंतररुग्ण रुग्णालयात दाखल होईल. त्यामुळे रुग्णांची संख्या कमी जास्त होते त्यानुसार कपडयांची संख्या सुध्दा कमी जास्त होते. त्यामुळे ३ वर्षाचा खर्च रु. ६०,००० x ३६ = रु. २१,६०,०००/- | | | | |

३. सदर खर्च २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, बाब १०-कंत्राटी सेवा, १९-आहार (२२१० ०६६५) या लेखाशिर्षामधून भागविण्यात येणार आहे.

**अटी व शर्ती-:**

१. सदर खरेदीसाठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग III/उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

२. खरेदी करावाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधीत तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश कोणत्याही पुरवठादारास फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच त्याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३. प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

४.खरेदी करण्यात येणा-या बाबींची पुरवठापुर्व व पुरवठयानंतर नमुना तपासणी (Pre/Post-dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विर्निदेश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात यावी.

५. खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (Storage and Distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply Chain Management) व वस्तुसुची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर खरेदीची व्दिरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

७. संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८. खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमीत करण्यात यावेत.

९. सदर खरेदी ३.०० लक्ष पेक्षा जास्त असल्याने ई-निविदा प्रक्रिया राबवून खरेदी करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला, उपविभाग-चार मधील अ.क्र.११, अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६०५११२२१७५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kavita Pradip Pise

Digitally signed by Kavita Pradip Pise
DN: cn=Kavita Pradip Pise, o, ou, email=kavita.pise@nic.in, c=US
Date: 2024.06.05 16:37:25 +05'30'

**(क. प्र. पिसे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), मुंबई.
५. वैदयकी अधिक्षक, जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, यवतमाळ.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
८. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).